**दि. २०.७.२००२ रोजी किंवा त्यापूर्वी संगणक प्रशिक्षणास प्रवेश घेतलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना संगणक प्रशिक्षण खर्चाच्या प्रतिपूर्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्र. प्रशिक्षण २०००/प्रक्र.५/२००१/३९,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
दिनांक: ३० ऑक्टोबर, २००२

वाचावे:-१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रशिक्षण १०००/प्रक्र१४३/३९, दि. १०.७.२०००

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रशिक्षण २०००/प्रक्र५/२००१/३९, दि. २०.७.२००२

**प्रस्तावना:-**

शासकीय कामकाजाचे संगणकीकरण करुन कामकाजास गती देण्याच्या उद्देशाने विविध कार्यालयांसाठी संगणक खरेदी करण्यांत आले. या संगणकांचा योग्य वापर होण्यासाठी अधिकारी/कर्मचाऱ्यांना संगणक प्रशिक्षण खर्च देऊन शासकीय खर्चाने शासन मान्य अशा ५ संगणक संस्थांमार्फत संगणक प्रशिक्षणाची योजना सन १९९८ पासून राबविण्यांत आली.

२. दोन वर्षानंतर या योजनेच्या प्रगतीचा आढावा घेऊन याबाबत प्राप्त झालेल्या सूचनांचा सखोल अभ्यास करुन ५ संगणक संस्थांची मान्यता रद्द करण्याचा आणि संगणक प्रशिक्षणासाठी रु. २५००/- इतकी रक्कम देण्याचा तसेच कोणत्या कर्मचाऱ्यांना संगणक प्रशिक्षणासाठी पाठवावयाचे याचा निर्णय विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुखांनी घेण्याबाबत दि. १०.७.२००० च्या निर्णयान्वये तरतुद करण्यात आली. याच आदेशानुसार वयाची ५५ वर्षे पूर्ण न झालेल्यांनी दि. ३१.१२.२००२ पर्यंत संगणक प्रशिक्षण पूर्ण करण्याबाबतही निर्णय घेण्यांत आला. त्यानंतर दि. २०.७.२००२ च्या निर्णयानुसार संगणक प्रशिक्षणासाठी रु. २५००/- ऐवजी रु. ३००/- इतकी रक्कम देण्याची तरतुद करण्यांत आली.

३. वरील विविध तरतुदींच्या अनुषंगाने दि. १०.७.२००० ते दि. २०.७.२००२ या कालावधीत संगणक प्रशिक्षण घेतलेल्यांना किती रक्कम देण्यात यावी याबाबत विचारणा होत आहे. त्यानुसार याबाबत आता खालील प्रमाणे निर्णय घेण्यांत येत आहे.

**शासन निर्णय**

शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांनी संगणक ज्ञान विषयक शैक्षणिक अर्हता दि. ३१.१२.२००२ पूर्वी प्राप्त करुन विहित प्रमाणपत्र शासनास सादर करण्याबाबत दि. १०.७.२००० च्या शासन निर्णयान्वये निर्देश दिलेले होते. तसेच किती कर्मचाऱ्यांना संगणक प्रशिक्षणास पाठवावयाचे याबाबतही विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुखांना अधिकार दिलेले होते. त्यानुसार दि.

१०.७.२००० ते दि. २०.७.२००२ या कालावधीत ज्या शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांनी परस्पर विहित संगणक प्रशिक्षण घेतलेले आहे त्यांना संगणक प्रशिक्षण खर्चापोटी विहित रक्कमेची प्रतीपूर्ती करण्यास ,शा. नि. साप्रवि क्र.प्रशिक्षण १०००/प्रक्र १४३ / ३९ दि.१०.७.२०००अन्वये विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख सक्षम आहेत. तथापि दि. २०.७.२००२ नंतर विहित अशा संगणक प्रशिक्षणास प्रवेश घेऊन अथवा प्रशिक्षणास प्रवेश न घेता सरळ परिक्षेस बसून परिक्षा उत्तीर्ण झाल्याचे विहित प्रमाणपत्र सादर करणाऱ्यांना मात्र रु. ३००/- इतकीच प्रतीपूर्ती करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**(नितीन गद्रे)**
**संचालक (मातं)**

**प्रति,**
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा) मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा) मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,(विधान परिषद /विधान सभा),मुंबई,
महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई,
महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र , नागपूर,
महालेखापाल -१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई,
महालेखापाल -२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र , नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / लेखा कोष भवन वांद्रे (पू.) मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र ज्ञान महामंडळ (मर्यादित)
संचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण इमारत १ला मजला,एल्फीन्स्टन टेक्नीकल हायस्कूल परिसर, ३ महानगरपालिका मार्ग,मुंबई ४०००१
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषद/महानगरपालिकांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र ज्ञान महामंडळ मर्यादित, पहिला मजला,व्यवसाय शिक्षण प्रशिक्षण इमारत,३ महानगरपालिका मार्ग,मुंबई ४०० ००१.
सर्व नगरपरिषदांचे मुख्याधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती (२ प्रती).

-------